जिल्हा दरसुचीबाहेरील बाबींचे (Non District Scheduled Items) दर मंजूर करतांना सुसूत्रता ठेवणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- २९/१०/२०१८.

**संदर्भ:-** शासन परिपत्रक क्र.-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७

**प्रस्तावना:-**

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, जिल्हा दरसूची मधील समाविष्ठ बाबींच्या व्यतिरिक्त इतर कामे करावयाची असल्यास अशा दरांना स्थानिक पातळीवर दर प्राप्त करुन घेऊन त्यास संबंधित सा.बां. मंडळाचे अधीक्षक अभियंता मंजुरी देत असतात. अशा प्रकारचे दर मंजूर करतांना केवळ स्थानिक बाजारभावाचे दर विचारात घेतल्यामुळे पुरेशी स्पर्धा न होता जास्त दराने कामे होत असण्याची शक्यता नाकारण्यात येत नाही. त्यामुळे ह्यात शासनाचे आर्थिक नुकसान होण्याची शक्यता नाकारता येत नाही. अनेक ठिकाणी असेही लक्षात आले आहे की, एका मंडळाने मान्य केलेले दर सरसकट इतर मंडळाकडे वापरले जातात. त्यामुळे ह्या मंजूरीच्या पध्दतीमध्ये एकसुत्रता आणण्याबाबत शासनाने दिनांक ११/०४/२०१७ रोजी सुचना निर्गमीत केल्या होत्या. सदर सुचनांचे अंमलबजावणीत येत असलेल्या अडचणी विचारात घेऊन सर्व मुख्य अभियंता यांनी त्यात बदल करावा असे,दिनांक ८/१०/२०१८ रोजी झालेल्या बैठकीत विनंती केली होती. त्याअनुषंगाने शासन परिपत्रकामध्ये खालील प्रमाणे बदल करण्यात येत आहे.

**शासन आदेश :-**

ह्यापुढे उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे दरसुचीबाहेरील दर (Non District Scheduled Rates) मंजूर करतांना सार्वजनिक बांधकाम मंडळ कार्यालयांना खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे सुधारित आदेश देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | दिनांक.११/०४/२०१७ चे शासन परिपत्रक. | करण्यात आलेले बदल |
|---|---|---|
| १ | नियमित व वारंवार वापरल्या जाणाऱ्या बाबींचे दर जिल्हा दरसूचीमध्ये समाविष्ट करण्यात यावेत. | बदल नाही. |
| २ | रु.२.०० लक्ष पेक्षा जास्त रकमेची बाब (Single Item) असल्यास त्यास स्थानिक वृत्तपत्रातून जाहिरात देऊन स्पर्धात्मक दर प्राप्त करुन घ्यावेत. एकाच वेळी अनेक बाबींचे काम असल्यास शक्यतो एकाच जाहिरातीमध्ये समाविष्ट करण्यात यावेत. | दरसुची बाह्य बाब (Single Item) रु.१०.०० लक्ष पेक्षा जास्त रकमेची असल्यास त्यास स्थानिक वृत्तपत्रातून जाहिरात देऊन स्पर्धात्मक दर प्राप्त करुन घ्यावेत. एकाच वेळी अनेक बाबींचे काम असल्यास शक्यतो एकाच जाहिरातीमध्ये समाविष्ट करण्यात यावेत. त्यापेक्षा कमी दराच्या बाबींचे दर मंजूर करण्याचे प्राधिकार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावली परिच्छेद १८७ नुसार अधिक्षक अभियंता यांना असतील. |
| ३ | रु.५.०० लक्ष पेक्षा जास्त रकमेची बाब (Single Item) असल्यास त्यास जिल्हा वृत्तपत्रात/ आवश्यकतेनुसार राज्यस्तरीय वृत्तपत्रात जाहिरात देऊन स्पर्धात्मक दर प्राप्त | सदर सुचना रद्द करण्यात आली आहे. |

| | | |
|---|---|---|
| | करुन घ्यावेत व त्यास मुख्य अभियंता ह्यांची मान्यता घेण्यात यावी. मुद्दा क्र. २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकाच वेळी अनेक बाबीं असल्यास एकाच वेळी वृत्तपत्रात जाहिरातीसाठी देण्यात यावी. | |
| ४ | एका सा.बां. मंडळाने मान्य केलेले दर सरसकट इतर सा.बां. मंडळाने कुठल्याही परिस्थितीत वापरु नयेत. तथापि फक्त अभ्यास करण्यापुरता त्याचा मर्यादित वापर करावा व त्या सा.बां.मंडळाने स्वतंत्र कार्यवाही करावी. | एका सा.बां. मंडळाने मान्य केलेले दर सरसकट इतर सा.बां. मंडळाने कुठल्याही परिस्थितीत वापरु नयेत. तथापि फक्त अभ्यास करण्यापुरता त्याचा मर्यादित वापर करावा व दरसुचीची कार्यवाही मंडळ निहाय अधीक्षक अभियंता यांनी करावी. |
| ५ | अत्यावश्यक परिस्थितीत एका सा.बां.मंडळाने मान्य केलेले दर त्याच प्रादेशिक विभागातील इतर सा.बां.मंडळांना वापरायवयाचे असल्यास मुख्य अभियंता यांची मंजूरी घेणे अनिवार्य राहील. | अत्यावश्यक परिस्थितीत एका सा.बां.मंडळाने मान्य केलेले दर त्याच प्रादेशिक विभागातील इतर सा.बां.मंडळांना वापरता येतील. एकाच प्रादेशिक विभागातील सर्व मंडाळाचे समान दर राहतील याची दक्षता मुख्य अभियंता यांनी घ्यावी. |
| ६ | ज्याप्रमाणे संपूर्ण महाराष्ट्र राज्यासाठी एकच दरसूची (Schedule of Rates) लवकरच अमलांत येणार आहे व ती Web site वर असणार आहे. त्याचप्रमाणे असे जिल्हा दरसूचीबाहेरील (Non DSR Items) बाबींचे दर Web site वर अपलोड करणे अनिवार्य असणार आहे. | सदर सुचना रद्द करण्यात आली आहे. |

वरील सूचनांची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१८१०२९१४५७३९१०१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.10.29 15:03:54 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
२. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग.
४. निवडनस्ती.